**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत २५ पैसे मधून आयुर्वेदिक पौष्टिक बिस्किटे पुरविणे बाबत ..**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र. २३५ /का-५

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १५ नोव्हेंबर , २०११

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय , पुणे यांचे पत्र क्रमांकः-

१) मबावि / एबाविसेयो / का-२ /३२६१ /२०११, दिनांक १२.८.२०११

२) मबाविआ /एबाविसेयो / का-२/ ३३९५/२०११ दि.२०.८.२०११

३) मबाविआ/एबाविसेयो/का-२/३६०७/२०११ दिनांक १४.९.२०११

४) मबाविआ/एबाविसेयो/का-२/३७०४/२०११ दिनांक २७.९.२०११

**शासन निर्णय :-** :-एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत २५ पैसे उपलब्ध तरतूदीतून गोवर्धन आयुर्फार्मा प्रा.लि.यांचे दर निश्चित केलेल्या दरानुसार राज्यातील नागरी व ग्रामीण प्रकल्पातील १ ते ३ वर्षे वयोगटातील १४,३६,६७७ लाभार्थ्यांना प्रति दिन १ बिस्किट याप्रमाणे ४० दिवसासाठी ५,७४,६७,०८० इतकी बिस्किटे (२८,७३,३५४ पुडे) एक पुडा १०० ग्रॅम (२० बिस्किटे) रू २४.७५ हया दराने बिस्किटे खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. ७,११,१५,५१२/- (अक्षरी रूपये सात कोटी अकरा लाख पंधरा हजार पाचशे बारा फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये खालील अटीनुसार मान्यता देण्यात येत आहे.

१) पुरवठयाच्या वेळी मुदतबाहयतेचा कालावधी (Expiry Date) सहा महिन्यापेक्षा कमी नसावा.

२) पुरवठादाराने मागणी प्रमाणे विहीत प्रमाणात , विहीत केलेल्या गुणवत्तेनुसार अनुसूचित जातीचे लाभार्थी असलेल्या ग्रामीण व नागरी क्षेत्रातील सर्व अंगणवाडीपर्यंत मालाचा पुरवठा करण्यात आलेला आहे , याबाबतची खात्री करण्यात यावी. तसेच सदर पुरवठा केलेल्या बाबीवर आयसीडीएसच्या वापरासाठी / शासनामार्फत पुरवठा असा शिक्का मारलेला किंवा लेबल लावलेला असावा. आयुर्वेदिक पौष्टिक बिस्किट / वाटप / पुरवठा व जादा खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास व लेखा आक्षेप उद्‌भवल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांची राहील.

३) हया योजनेचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा या दृष्टीने स्वंयस्पष्ट माहिती, अंगणवाडयात नोंदवहीमध्ये उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग / मुदत बाहयतेचा दिनांक व शिल्लक याबाबतची योग्य नोंद ठेवणे इ. बाबत उचित मार्गदर्शक सूचना आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे हयांनी दयाव्यात.

४) पुरवठादाराने मागणी प्रमाणे विहीत प्रमाणात , विहीत केलेल्या गुणवत्ते नुसार मालाचा पुरवठा नागरी व ग्रामीण क्षेत्रातील सर्व अंगणवाडयांपर्यत केला आहे , याची खात्री करण्यात यावी. त्याचप्रमाणे २५ पैसे तरतूदीतून उपलब्ध होणा-या निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. खरेदी / वाटप / पुरवठा व जादा खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांची राहील.

२. यासाठी होणारा खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात २२३६-पोषण आहार,०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, (०३) (०१) - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (२२३६००२७) (स्थानिक क्षेत्र) - १९ आहार खर्च आणि २२३६-पोषण आहार , ०२ पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, नागरी (०१) (०१) पोषण आहार कार्यक्रम (२२३६०१८१) , १९ आहार खर्च या लेखाशिर्षा खाली भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-१००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(श.पा.वारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, महिला व बाल विकास , महाराष्ट्र राज्य, पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी प्रकल्प) (आयुक्त यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
सहाय्यक कोषागार अधिकारी, रायगड भवन, नवी मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)